सन २०१६-१७ टंचाई अंतर्गत मौजे ताडपिंपळगाव, ता.कन्नड, जिल्हा औरंगाबाद आणि मौजे देभेगांव, ता. कन्नड, जि. औरंगाबाद येथील तात्पुरत्या पाणी पुरवठा योजनांना प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०१७/प्र.क्र. ४३/पापु १४**

जी. टी. रुग्णालय संकुल, ७ वा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: १९ एप्रिल, २०१७

**वाचा -**

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई १०९९/प्र.क्र. १२/पापु १४, दिनांक ३.२.१९९९
२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई २०१६/प्र.क्र. १४३/पापु १४, दिनांक ०४.०५.२०१६
३) विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचे पत्र क्रमांक जा.क्र. २०१५ / मशाका /नैआ-१/कावि-८७७, ८७८, दिनांक ०६.०४.२०१७ चे पत्र.
४) जिल्हाधिकारी,औरंगाबाद यांचे क्रमांक २०१७/मशाका-२/पाटं/प्र.क्र.२११/कावि - ६५९ दिनांक २९.०३.२०१७ चे पत्र.
५) शासन पत्र क्रमांक टंचाई २०१७/प्र.क्र. ३७/पापु १४, दिनांक १७.०४.२०१७ (बैठकीचे इतिवृत्त)

**प्रस्तावना -**

विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी सन २०१६-१७ च्या टंचाई कालावधीसाठी तातडीची पाणी पुरवठा योजनेंतर्गत मौजे ताडपिंपळगांव, ता. कन्नड, जिल्हा औरंगाबाद येथील तात्पुरत्या पाणी पुरवठा योजनेचा रुपये २९,७९,३००/- किंमतीचा व मौजे. देभेगांव, ता. कन्नड, जिल्हा- औरंगाबाद येथील तात्पुरत्या पाणी पुरवठा योजनेचा रुपये २२,६४,९००/- किंमतीचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्ताव पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ नागरी व ग्रामीण क्षेत्रातील विहित आर्थिक

व भौतिक निकषाबाहेरील तात्पुरत्या पाणी पुरवठा योजना / उपाययोजनांना प्रशासकीय मंजूरी देण्यासाठी प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेल्या स्थायी समितीच्या दिनांक १५.०४.२०१७ रोजी झालेल्या बैठकीत मान्यतेसाठी विचारात घेण्यात आला.

स्थायी समितीच्या दिनांक १५.०४.२०१७ रोजी झालेल्या बैठकीत या प्रस्तावावर सविस्तर चर्चा होऊन प्रस्तावास मंजूरी देण्यात आली. त्या अनुषंगाने सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी मौजे ताडपिंपळगांव आणि मौजे देभेगांव, ता. कन्नड, जिल्हा औरंगाबाद येथील तात्पुरत्या पाणी पुरवठा योजनेला प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र. ३ च्या पत्रासोबत शासनास सादर केलेला आहे. सदर प्रस्तावात नमुद मौजे ताडपिंपळगांव, ता. कन्नड, जिल्हा औरंगाबाद या तात्पुरत्या पाणी पुरवठा योजनेच्या रुपये २९,७९,३००/- ( रुपये एकोणतीस लाख एकोणऐंशी हजार तीनशे फक्त ) आणि मौजे देभेगांव, ता. कन्नड, जिल्हा औरंगाबाद या तात्पुरत्या पाणी पुरवठा योजनेच्या रुपये २२,६४,९००/- ( रुपये बावीस लाख चौसष्ट हजार नउशे फक्त ) अशा एकूण रु. ५२,४४,२००/- ( रुपये बावन्न लाख चव्वेचाळीस हजार दोनशे फक्त) किंमतीच्या दोन्ही प्रस्तावांना स्थायी समितीने दिनांक १५.०४.२०१७ च्या बैठकीत मान्यता दिलेली आहे. त्या अनुषंगाने या आदेशान्वये मौजे ताडपिंपळगांव, ता. कन्नड, जिल्हा औरंगाबाद आणि मौजे देभेगांव, ता. कन्नड, जिल्हा औरंगाबाद या तात्पुरत्या पाणी पुरवठा योजनाच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१) जिल्हाधिकारी,औरंगाबाद यांनी मौजे ताडपिंपळगांव, ता. कन्नड आणि मौजे देभेगांव, ता. कन्नड या गावांत पिण्याच्या पाण्याची टंचाई निर्माण झाली असल्याचे सर्वप्रथम घोषित करणे.

२) सदर प्रस्तावात नमूद केलेल्या तात्पुरत्या पाणी पुरवठा योजनांची कामे कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांचेमार्फत करणे आवश्यक राहील.

३) सदर योजनांचे काम प्रस्तावात नमूद केल्याप्रमाणे टंचाई कालावधीच्या आत तातडीने पूर्ण करावी. अन्यथा योजनांची मान्यता आपोआपच व्यपगत होईल.

४) विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी सदर योजनेकरिता निविदा प्रक्रिया झाल्यानंतर योजनाच्या सुरुवातीला ५०% इतका निधी द्यावा. उर्वरित निधी योजना कार्यान्वित झाल्यानंतर देण्यात यावा.

५) सदर योजनांची प्रस्तावात नमूद कामे जिल्हा परिषद, औरंगाबाद मार्फत पूर्ण करण्यात आल्यानंतर योजनेची देखभाल दुरुस्ती व योजनांचे व्यवस्थापन संबंधित ग्रामपंचायत मार्फत करणे आवश्यक राहील.

२. याबाबत होणारा खर्च मागणी क्र. सी-६, २२४५ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०१- अवर्षण, १०२ पिण्याच्या पाण्याचा पुरवठा, ९१ - राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१)(०१) पिण्याच्या पाण्याच्या आकस्मिक निकडीच्या पुरवठा (२२४५००९३) (दत्तमत) (वेतनेत्तर) - ३१, सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखालील तरतूदीमधून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ नागरी व ग्रामीण क्षेत्रातील विहित आर्थिक व भौतिक निकषाबाहेरील तात्पुरत्या पाणी पुरवठा योजना / उपाययोजनांना प्रशासकीय मंजूरी देण्यासाठी प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे अध्यक्षतेखाली स्थापन केलेल्या सचिवस्तरीय स्थायी समितीच्या दिनांक १५.०४.२०१७ रोजी झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४१७१४४९२६६०२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahesh Bhagwan Sawant

Digitally signed by Mahesh Bhagwan Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d1f670a17d77c8ddff69694de2a07b7ff855dafef954aefa82ca28bd6cc6adb6, cn=Mahesh Bhagwan Sawant
Date: 2017.04.19 10:23:20 +05'30'

( म.भ. सावंत )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
२. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर

३. अपर मुख्य सचिव, (म.व पु.) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव, वित्त विभाग ( लेखा व कोषागारे), मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
६. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नवी मुंबई
७. विभागीय आयुक्त, औरंगाबाद
८. जिल्हाधिकारी,औरंगाबाद
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,औरंगाबाद
१०.कार्यकारी अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,औरंगाबाद
११.कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद,औरंगाबाद
१२. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक
१३.उप सचिव (पापु १४) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक
१४.पापु १४ (निवडनस्ती)